राज्यात उद्भवलेल्या कोरोना विषाणूच्या प्रादुर्भावाच्या पार्श्वभूमीवर आदिवासी लोकांना सहाय्य करण्यासाठी खावटी अनुदान योजनेच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना.

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्र. खाअयो-२०२०/प्र.क्र.३७/का.३.

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३० सप्टेंबर, २०२०.

वाचा :-

आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.खाअयो-२०२०/प्र.क्र.३७/का.३, दि.०९.०९.२०२०.

प्रस्तावना :-

राज्यात उद्भवलेल्या कोरोना विषाणूच्या प्रादुर्भावाच्या पार्श्वभूमीवर आदिवासी लोकांना सहाय्य करण्यासाठी खावटी अनुदान योजना सुरु करण्याबाबतच्या आदिवासी विकास विभागाच्या प्रस्तावास मा.मंत्रिमंडळाने दि.१२ ऑगस्ट, २०२० रोजी मान्यता दिलेली आहे. त्याअनुषंगाने शासन निर्णय दि.९ सप्टेंबर, २०२० रोजी निर्गमित केलेला आहे. सदर योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी योजना राबविणाऱ्या यंत्रणेसाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

शासन निर्णय :-

खावटी अनुदान योजनेच्या परिणामकारक अंमलबजावणीसाठी खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत :-

१. शासन निर्णयामध्ये दिलेल्या पाच प्रकारच्या लाभार्थ्यांची संख्या निश्चित केलेली आहे, त्यांची प्रकल्प कार्यालय निहाय जनगणनेची आकडेवारी, मनरेगा लाभार्थी, आदिम जमात, पारधी व वैयक्तिक वनहक्क धारक यांची उपलब्ध माहितीच्या आधारे जिल्हा निहाय अंदाजे पात्र लाभार्थ्यांची संख्या लक्षांकाच्या स्वरुपात आयुक्त, आदिवासी विकास व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ यांनी अपर आयुक्त व प्रकल्प अधिकारी यांना उपलब्ध करुन द्यावी जेणे करुन क्षेत्रीय अधिकाऱ्यांना त्यांच्या जिल्ह्यात लाभार्थी/ लक्षांक किती आहे याची माहिती मिळेल. पात्र लाभार्थी निश्चित करताना शासकीय कर्मचारी,निमशासकीय कर्मचारी, सधन आदिवासी यांना न घेता अनुसूचित जमातीमधील गरीबातील गरीब हाच निकष ठेवण्यात यावा.

२. आयुक्त, आदिवासी विकास व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ यांनी खावटी अनुदान योजनेचा लाभ घेण्यासाठी शासन निर्णयानुसार पात्र लाभार्थ्यांकडून भरावयाच्या अर्जाचे प्रारुप अंतिम करुन संबंधित प्रकल्प अधिकारी यांना अर्ज उपलब्ध करुन द्यावे. अर्जावर अनुक्रमांक / यूनिक क्रमांक टाकावा जेणेकरुन अर्ज व लाभार्थी यांचा ताळमेळ ठेवता येईल तसेच अर्जाचा दुरुपयोग होऊ शकणार नाही.

३. खावटी अनुदान योजनेच्या शासन निर्णयानुसार निश्चित केलेल्या सर्व लाभार्थ्यांचे पोस्टल बॅक खाते हे भारतीय डाक खात्याकडून स्वतंत्रपणे उघडण्यात यावे. त्यानुसार आयुक्त, आदिवासी विकास व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ यांनी डाक खात्याकडून लाभार्थ्यांची पोस्टल बॅक खाते उघडणे व आधार कार्ड उपलब्ध करुन देणे या प्रक्रियेचा कालबद्ध कार्यक्रम निश्चित करुन अपर आयुक्त व प्रकल्प अधिकारी यांना कळवावा. त्यानुसार स्थानिक डाक अधिकाऱ्यांची बैठक घेऊन प्रकल्प अधिकारी यांनी लाभार्थ्यांचे पोस्टल बॅक खाते उघडण्याची प्रक्रिया सुरू करावी. यासाठी प्रकल्प अधिकाऱ्यांनी त्यांच्या क्षेत्रात असलेल्या पात्र लाभार्थ्यांची यादी डाक खात्यास उपलब्ध करुन द्यावी. त्यानुसार डाक कर्मचारी लाभार्थ्यांच्या घरी जाऊन त्यांचे पोस्टल बँक खाते उघडतील. यासाठी प्रकल्प अधिकारी यांनी स्थानिक कर्मचारी डाक खात्याच्या कर्मचाऱ्यांसोबत नियुक्त करावेत.

४. पात्र लाभार्थ्यांची निश्चिती करणे, अर्ज भरून घेणे इत्यादी साठी ग्रामीण भागासाठी व नागरी क्षेत्रासाठी ग्रामस्तरीय व शहरस्तरीय समितींची स्थापना करण्यात यावी. ग्रामस्तरीय समितीमध्ये संबंधीत ग्राम सेवक, तलाठी व आदिवासी विकास विभागाचा स्थानिक कर्मचारी (आदिवासी विकास निरिक्षक, शिक्षक, गृहपाल, अधिक्षक इ.) तर शहरस्तरीय समितीमध्ये संबंधीत नागरी स्थानिक संस्थेचे (महानगरपालिका, नगरपालिका व नगर पंचायत) दोन कर्मचारी, आदिवासी विकास विभागाचे स्थानिक क्षेत्रातील एक कर्मचारी यांची समिती स्थापन करण्यात यावी. शहरस्तरीय समिती हे शहरातील लोकसंख्येच्या नुसार आवश्यकता भासल्यास प्रभाग स्तरीय समिती स्थापन करण्यात यावी. सदर समितीने दि.९ सप्टेंबर, २०२० च्या खावटी अनुदान योजनेच्या शासन निर्णयातील परिच्छेद ३ मध्ये नमुद पाचही प्रकारच्या लाभार्थ्यांची यादी निश्चित करुन अर्ज भरुन घेण्याचे काम करावे. ग्राम / शहर स्तरीय समितीने लाभार्थ्यांचे अर्ज भरुन घेतांना त्यांचे कडून लाभार्थ्यांचे आधारकार्ड व जमातीचा दाखला प्राप्त झाल्यास स्कॅन करुन घ्यावा. परंतु ज्यांचेकडे जमातीचा दाखला नाही अशा कुटुंबांकडून अर्ज भरुन घेताना ग्राम/शहर स्तरीय समितीने विशेष काळजी घेवून व तपासून निर्णय घ्यावा. खावटी अनुदानाचा दुरुपयोग होऊ नये व एकाच कुटुंबातील

लाभार्थी एकापेक्षा जास्त गटामध्ये बसत असल्यास त्यास एकदाच खावटी अनुदान मिळावे यासाठी कुटुंबप्रमुखाचे आधारकार्ड घेणे आवश्यक राहिल. ज्यांच्या कडे नाहीत त्यांचे आधारकार्ड काढून घेण्यासाठी प्रकल्प अधिकारी यांनी कार्यवाही करावी. समितीने योग्य लाभार्थी निवडण्यासाठी आवश्यक ती दक्षता घ्यावी. कुठल्याही चुकीच्या पध्दतीने चुकीच्या लाभार्थ्यांची निवड होऊ नये यासाठी अपर आयुक्त, प्रकल्प अधिकारी, तहसिलदार, गट विकास अधिकारी यांनी स्थानिक ग्राम/ शहर स्तरीय समितीच्या कामावर संनियंत्रण ठेवावे.

५. दि.९ सप्टेंबर, २०२० च्या खावटी अनुदान योजनेच्या शासन निर्णयातील परिच्छेद ३ नुसार मनरेगा मध्ये किमान एक दिवस कार्यरत आदिवासी मजूर (दि.१.०४.२०१९ ते दि.३१.०३.२०२० या कालावधीत) यासाठी आयुक्त, रोजगार हमी योजना यांचेकडून तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडून प्राप्त यादीतील पात्र कुटूंबांची नावे प्रकल्प अधिकारी यांनी प्राप्त करुन तसेच ती तपासून ग्राम/शहरस्तरीय समितीस उपलब्ध करुन द्यावी. सर्व प्रथम भूमिहीन लाभार्थ्यांकडून अर्ज भरुन घेण्याचे काम प्राधान्य क्रमाप्रमाणे पुर्ण करावे.

६. आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून आदिम जमातीच्या कुटूंबांची उपलब्ध माहिती व वैयक्तिक वनहक्क धारकांची माहिती प्रकल्प अधिकारी यांनी प्राप्त करुन ग्राम/ शहरस्तरीय समितीस उपलब्ध करुन द्यावी. तसेच, वनहक्क धारकांची अद्ययावत यादी संबंधीत जिल्हाधिकारी यांच्याकडून प्राप्त करुन घ्यावी.

७. प्रकल्प अधिकारी यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील पारधी जमातीच्या कुटूंबांची यादी ग्राम/शहर स्तरीय समितीस उपलब्ध करुन द्यावी व संबंधित ग्राम/शहर स्तरीय समितीने लाभार्थ्यांचे अर्ज भरुन घ्यावेत.

८. जिल्हाधिकारी यांच्या सल्ल्याने संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी त्यांच्या क्षेत्रातील परितक्त्या, घटस्फोटीत महिला, विधवा, कुमारी माता, भूमिहीन शेतमजूर, अपंग व्यक्ती असलेले कुटूंब, अनाथ मुलांचे संगोपन करणारे कुटूंब यांची प्रकल्पनिहाय यादी तयार करुन सदर यादी ग्राम/शहर स्तरीय समितीस सोपवावी व त्यांचेकडून अर्ज भरुन घ्यावे. याप्रकारातील लाभार्थ्यांची यादी अपंग आयुक्तालय, महिला व बाल विकास, समाजकल्याण इत्यादी जिल्हास्तरीय यंत्रणेकडून प्राप्त करुन घ्यावी.

९. वरीलप्रमाणे शासन निर्णयामध्ये नमूद सर्व पाच प्रकारच्या लाभार्थ्यांची माहिती ग्राम/शहर स्तरीय समितींकडून गाव /शहर निहाय यादी प्राप्त करुन तालुकानिहाय एकत्रित लाभार्थ्यांची यादी संबंधित गट विकास अधिकारी, तहसिलदार, उप प्रादेशिक व्यवस्थापक, आदिवासी विकास महामंडळ, महानगरपालिका/नगरपालिक/नगरपंचायत यांचे सहायक आयुक्त/वार्ड ऑफिसर/मुख्याधिकारी व प्रकल्प अधिकारी यांनी संयुक्तपणे तयार करुन

प्रमाणित करावी. याच आधारे प्रकल्प अधिकारी यांनी प्रकल्प कार्यक्षेत्रात येणाऱ्या सर्व तालुक्यांची माहिती एकत्रित करुन एक प्रकल्प निहाय यादी तयार करुन अपर आयुक्त यांच्या समितीस सादर करावी.

१०.आयुक्त, आदिवासी विकास यांनी खावटी अनुदान योजनेअंतर्गत रुपये २,०००/- लाभार्थ्यांना थेट त्यांच्या खात्यात वर्ग करणे तसेच वस्तुची किट वाटप लाभार्थ्यांना झाल्याचे प्रमाणीकरण करण्यासाठी एक पोर्टल व मोबाईल ॲप विकसित करावे. यासाठी व्यवस्थापकीय संचालक, आदिवासी विकास महामंडळ यांनी आवश्यक निधी आयुक्तालयास वितरीत करावा.

११.प्रकल्प अधिकारी यांनी त्यांच्या प्रकल्पातील प्रमाणित लाभार्थ्यांच्या यादीची डेटा एन्ट्री विहित प्रपत्रात ऑनलाईन पोर्टलवर करुन घ्यावी. सदर एन्ट्री करतांना लाभार्थ्यांचे आधार क्रमांक, आधार कार्डनुसार नाव, जन्म तारीख व पोस्टल बॅक खाते, इ. काळजीपुर्वक भरण्यात यावे.

१२. डेटा एन्ट्री झाल्यानंतर ऑनलाईन पोर्टलमार्फत आधारचे प्रमाणिकरण (Authentication) होईल. त्यानुसार प्रमाणित झालेल्या लाभार्थ्यांची यादी प्रकल्प अधिकारी यांच्याकडे तपासणी व मंजुरीसाठी जाईल. मंजुर झालेली यादी ही अपर आयुक्त समितीकडे मंजुरीसाठी पाठवण्यात यावी. या समितीने मंजूर केलेली यादी आयुक्त आदिवासी विकास विभाग यांच्याकडे ऑनलाईन पाठवण्यात यावी. त्यानुसार प्रमाणित लाभार्थ्यांना रुपये २,०००/- इतकी रक्कम थेट खात्यामध्ये वितरीत करण्यात यावी.

१३. ज्या लाभार्थ्यांना थेट रक्कम खात्यामध्ये वितरीत झाली अशा लाभार्थ्यांना वस्तु स्वरुपात किटचे वाटप हे ग्राम/शहर स्तरीय समितीच्या माध्यमातून करण्यात यावे. सदर वाटप करतांना ग्रामीण भागात ग्राम पंचायतीचे सरपंच, उप सरपंच, अनुसूचित जमातीचे ग्राम पंचायत सदस्य तर शहरी भागात संबंधीत शहरस्तरीय समितीने प्रभागातील नगरसेवक, अनुसूचित जमातीचे नगरसेवक यांच्या उपस्थितीत किटचे वाटप करावे.

१४. वस्तुचे लाभार्थ्यांना वाटप करतांना संबंधित प्रकल्प कार्यालयातील कर्मचारी हे ज्या गावांमध्ये वाटप करायचे आहे त्या लाभार्थ्यांचा पोर्टलवरील युनिक कोडची यादी प्रिंट करुन वाटपा दरम्यान संबंधित लाभार्थ्याची ओळख प्रमाणित करुन युनिक कोड जुळवून, वस्तुचे किट सुपुर्द करताना युनिक कोड व लाभार्थीचे फोटो घेऊन मोबाईल ॲप वर अपलोड करेल.

१५. खावटी अनुदान योजनेतंर्गत लाभार्थ्यांची डेटा एन्ट्री, योजनेची प्रचार प्रसिध्दी, प्रशासकीय खर्च व इतर अनुषंगिक खर्चासाठी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी

आदिवास विकास महामंडळ मर्यादित, नाशिक यांनी प्रकल्प अधिकारी यांना आवश्यक निधी उपलब्ध करुन द्यावा.

१६. वरील प्रमाणे सर्व प्रक्रियेवर अपर आयुक्त यांनी सनियंत्रण व समन्वय करुन साप्ताहीक अहवाल आयुक्त, आदिवासी विकास यांना सादर करावा. राज्यस्तरावर या योजनेचे समन्वय करण्यासाठी आयुक्त, आदिवासी विकास व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ यांनी संयुक्तपणे एक संनियंत्रण कक्ष नाशिक कार्यालयात स्थापन करावा. या कक्षातून प्रकल्प स्तर व अपर आयुक्त स्तरीय सर्व कामाची अद्यावत माहिती वेळोवेळी घेण्यात यावी तसेच, क्षेत्रीय स्तरावर काही अडचणी उद्भवल्यास त्याचे निराकरण या कक्षाद्वारे करण्यात यावे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००९३०१७४७५८६३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant Gopalrao Dhoke

Digitally signed by Laxmikant Gopalrao Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, serialNumber=e714bbcd4d43c6782884c7e7a2091f9f1edc1d97ebb542c48b98fb8c8bdd6cf4, cn=Laxmikant Gopalrao Dhoke
Date: 2020.10.01 13:33:03 +05'30'

**( ल. गो. ढोके )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.

२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.

३) मा.मंत्री (आदिवासी विकास), यांचे खाजगी सचिव.

४) मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास), यांचे खाजगी सचिव.

५) मा.संसद सदस्य (सर्व).

६) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा)

७) मा.विरोधी पक्षनेता (विधानपरिषद)

८) मा.विधीमंडळ सदस्य (सर्व).

९) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१०) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक.

११) अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) प्रधान सचिव (सहकार), सहकार व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) महासंचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक.
२१) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
२२) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
२३) आयुक्त, सहकार पुणे.
२४) सर्व विभागीय आयुक्त.
२५) सर्व जिल्हाधिकारी.
२६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
२७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक.
२८) सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास.
२९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
३०) कोषागार अधिकारी, सर्व जिल्हे.
३१) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
३२) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१७/व्यय-१४/अर्थसंकल्प-३/अर्थोपाय/कोषा प्रशासन-५), मंत्रालय, मुंबई.
३३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
३४) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
३५) संचालक (लेखा व कोषागारे), संगणक कक्ष, नवीन प्रशासन इमारत, मुंबई.
३६) महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक/नागपूर.
३७) सर्व प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ.
३८) सर्व सह सचिव/उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३९) सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४०) निवडनस्ती, कार्यासन क्र.३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

*****************